**मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इत्यादी वैद्यकीय प्रतिपूर्तीच्या आणि प्रवास भत्त्याची देयके तसेच मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री महोदयांच्या स्वीय सहायकांचे पारिश्रमिक आहरीत करण्याच्या कार्यपध्दतीत सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१३/कोषा-प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८ सप्टेंबर, २०१५.

<u>वाचा-</u>

**१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१३/कोषा प्र-५, दि.३१/०७/२०१५**

<u>प्रस्तावना -</u>

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इत्यादींचे वेतन व भत्ते बँकेमध्ये त्यांच्या बचत खात्यात जमा करण्याची कार्यपध्दती उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णयान्वये अवलंबिण्यात आली आहे व विभागातील सद्या असलेले आहरण व संवितरण अधिकारी; अवर सचिव; या देयकांसाठी आहरण व संतिवरण अधिकारी असतील असे आदेशित केले आहे. वैद्यकीय प्रतिपूर्तीबाबत या अगोदर असलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात येईल व यासाठी मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इ. स्वत: आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कार्यरत राहतील. तसेच प्रवास देयकाच्याबाबतीत यापूर्वीचीच कार्यपध्दती कायम राहील असे आदेशित केले आहे.

मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इत्यादी वैद्यकीय प्रतिपूर्तीच्या तसेच प्रवास भत्त्याच्या प्रयोजनार्थ स्वत:च स्वत:चे आहरण व संवितरण अधिकारी आहेत या कार्यपध्दतीत सुधारणा करण्याची तसेच मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री महोदयांच्या मतदार संघातील स्वीय सहाय्यकांची देयके पारित करण्यासाठी व त्यांच्या बचत खात्यात पारिश्रमिक जमा करण्यासाठीच्या कार्यपध्दतीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन आता पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

१. मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री इत्यादींच्या वैद्यकीय प्रतिपूर्तीची देयके तसेच प्रवास भत्ता देयकांसाठी यापुढे अवर सचिव, कार्यासन २१-रोख, सामान्य प्रशासन विभाग हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कार्यरत रहातील.

२. मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, मा.उपमंत्री महोदयांच्या मतदार संघातील स्वीय सहाय्यकांची देयके पारित करण्यासाठी व त्यांच्या बचत खात्यात पारिश्रमिक जमा करण्यासाठी अवर सचिव, कार्यासन २१-रोख, सामान्य प्रशासन विभाग हे यापुढे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. वरील सर्व प्रकारच्या देयकांची रक्कम थेट लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये ECS/NEFT द्वारे जमा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१४४६३४५१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.18 16:02:24 +05'30'

**ना.भा.रिंगणे**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३. राज्यपालांचे सचिव
४. मुख्यमंत्र्यांचे सचिव
५. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई

२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२. सर्व विभागीय आयुक्त
२३. सर्व जिल्हाधिकारी
२४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५. संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७. सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९. सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१. निवड नस्ती कोषा प्र.५